**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा कार्यक्रम (ISSNIP-World Bank) राबविण्यात येणा-या <u>विविध उपक्रमासाठी निधी वितरीत करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१६/प्र.क्र.२५७/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ मे, २०१७

<u>वाचा :</u> - (१) केंद्र शासनाचे,महिला व बाल विकास विभाग,पत्र क्र.F.No.१४-११/२०१५-WBP, दिनांक २६ एप्रिल २०१७

(२) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र.एबावि-२०१६/प्र.क्र.२२९/का.६,दि.१० एप्रिल २०१७

(३) सह प्रकल्प समन्वयक,जागतिक बँक सहाय्यित एबाविसे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प महाराष्ट्र राज्य,नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/का-Issnip/९४/२०१७,दिनांक ६ मे २०१७

<u>प्रस्तावना :-</u>

केंद्र शासनाने जागतिक बँकेच्या सहाय्याने अंमलात आणलेली एकात्मिक बालविकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या योजनेची राज्यातील २० जिल्हयात ३१७ प्रकल्पात एकुण ६०१३२ अंगणवाडी केंद्रात अंमलबजावणी सुरु करण्यास दिनांक ३० एप्रिल २०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने जागतिक बँक प्रकल्प,एकात्मिक बाल विकास सेवायोजना बळकटीकण व पोषण सुधारणा प्रकल्पाची पुनर्रचना मार्च-२०१६ मध्ये केलेली आहे. त्यानुसार पुर्वी केंद्र हिस्सा ९०% व राज्य हिस्सा १०% असे निधीचे प्रमाण होते. त्यामध्ये बदल करुन केंद्र हिस्सा ८८% व राज्य हिस्सा १२% असे निधीचे प्रमाण करण्यात आलेले आहे.तसेच पुर्वीच्या कार्यक्रमात देखिल बदल केलेला आह

२. केंद्र शासनाने जागतिक बँक प्रकल्प,एकात्मिक बाल विकास सेवायोजना बळकटीकण व पोषण सुधारणा प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी यापूर्वी सन २०१२-१३ ते २०१५-१६ या वर्षासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी राज्याकडे अखर्चित असलेला रुपये ६९९.९१ लाख निधी सन २०१६-१७ व २०१७-१८ मध्ये खर्च करण्यास केंद्र शासनाने दिनांक २७/४/२०१६ व दिनांक २६/४/२०१७ च्या पत्रान्वये परवानगी दिलेली आहे. तसेच केंद्र शासनाने दिनांक २७/१२/२०१६ च्या पत्रान्वये सन २०१६-१७ साठी रुपये २०७५.०९ लाख इतका निधी या कार्यक्रमासाठी केंद्र हिस्सा म्हणून उपलब्ध करुन दिलेला आहे. अशाप्रकारे एकुण रुपये २७७५.०० लाख निधी राज्य शासनाकडे खर्च करण्यासाठी उपलब्ध होता. सदर निधीमधुन जागतिक बँक प्रकल्प,एकात्मिक बाल विकास सेवायोजना बळकटीकण व पोषण सुधारणा प्रकल्प,कार्यक्रमातंर्गत राबविण्यात विविध उपक्रमासाठी सन २०१६-१७ मध्ये रुपये २१५५.१६ लाख खर्च झालेला आहे. सह प्रकल्प समन्वयक,जागतिक बँक सहाय्यित एबाविसे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प महाराष्ट्र राज्य,नवी मुंबई यांनी दिनांक ६ मे २०१७ च्या पत्रान्वये शिल्लक असलेला केंद्र हिश्याचा रुपये ६१९.८४ लाख निधी व त्याप्रमाणात राज्य हिश्याचा निधी खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत विनंती केलेली असून सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जागतिक बँक प्रकल्प,एकात्मिक बाल विकास सेवायोजना बळकटीकण व पोषण सुधारणा प्रकल्प,कार्यक्रमातंर्गत राबविण्यात येणा-या खालील उपक्रमासाठी मार्च-२०१७ च्या अधिवेशनात केंद्र हिस्सा व राज्य हिस्सासाठी अर्थसंकल्पित केलेल्या एकुण रुपये २०२५.४० लाख इतक्या Shadow तरतुदीमधुन एकुण रुपये ६९८.९२ लाख ( रुपये सहा कोटी अठयाण्णव लाख ब्याण्णव हजार फक्त ) इतका निधी खर्च करण्यास शासन मंजूरी देत आहे. त्यामध्ये केंद्र हिश्याच्या रुपये ६१५.०५ लाख व राज्य हिश्याच्या रुपये ८३.८७ लाख निधीचा समावेश आहे. राज्य प्रकल्प संचालक,जागतिक बँक सहाय्यित एबाविसे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प महाराष्ट्र राज्य,नवी मुंबई यांनी त्यांना उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी संबधित सर्व जिल्हांना आदेश निर्गमित करुन तातडीने वितरीत करावा. व त्याची प्रत शासनास सादर करावी.

**( रुपये लाखात )**

| अ.क्र. | राबविण्यात येणारे उपक्रम | कार्यक्रमासाठी मंजूर करण्यात आलेला निधी | मंजूर करण्यात आलेल्या निधीपैकी केंद्र हिस्सा ८८% | मंजूर करण्यात आलेल्या निधीपैकी राज्य हिस्सा १२% |
|---|---|---|---|---|
| १ | ICT-RTM कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून ११ महिन्यासाठी घेण्यात आलेल्या मनुष्यबळासाठी अदा करावयाची रक्कम | ३९१.३६ | ३४४.३९ | ४६.९७ |
| २ | ICT-RTM कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी प्रशिक्षण साहित्य छपाई खर्च | ४७.५६ | ४१.८६ | ५.७० |
| ३ | अंगणवाडीस्तरावर Community Based Events मार्च २०१७ पर्यंत | २६०.०० | २२८.८० | ३१.२० |
| | **एकुण** | **६९८.९२** | **६१५.०५** | **८३.८७** |

**३.** या प्रयोजनासाठी होणारा केंद्र हिश्याचा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३६- पोषण आहार, (०६) (०६) जागतिक बँकेचे सहाय्य, एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण आहार सुधारणा प्रकल्प (केंद्र हिस्सा ८८% ) (२२३६१८८३) ५०-खर्च व राज्य हिश्याचा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३६-पोषण आहार, (०६) (०७) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण आहार सुधारणा प्रकल्प (राज्य हिस्सा १२% ) (२२३६१८९२) ५०- इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या चालू आर्थिक वर्षी मंजूर व उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा. अर्थसंकल्पित निधीमधुन निधी वितरीत करताना केंद्र हिस्सा ८८% रुपये ६१५.०५ लाख व राज्य हिस्सा १२% रुपये ८३.८७ लाख याप्रमाणे एकुण ६९८.९२ लाख निधी वितरीत करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२५१७४२४१८४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.05.25 17:51:10 +05'30'

(ला.रा.गुजर)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (महिला व बाल विकास)मंत्रालय,मुंबई
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) राज्य प्रकल्प संचालक,जागतिक बँक प्रकल्प,एकात्मिक बाल विकास सेवायोजना बळकटीकण व पोषण सुधारणा प्रकल्प,नवी मुंबई
५) संचालक,माहिती तंत्रज्ञान ,माहिती तंत्रज्ञान संचालनालय,मंत्रालय,मुंबई
६) सर्व जिल्हाधिकारी
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
८) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग.
९) सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
१०) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
११) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
१२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -२, नागपूर
१३) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५) कक्ष अधिकारी (का.४) महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६) वित्त विभाग,(व्यय-६) मंत्रालय, मुंबई
१७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती (कार्यासन ६).